अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता व बांधकामाकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.....

सन २०२०-२१ करिता निधी वाटप

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि - २०२०/प्र.क्र.२७/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ जून, २०२०.

वाचा : १. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि २००९/प्र.क्र.१५/का.८, दिनांक ०२ मार्च, २०१०.
२. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दिनांक २० डिसेंबर, २०११,
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२०.
४. सहा.अधिक्षक, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम यांचे पत्र क्र.कक्ष १८/अका/अविसे/ कावी-२४५/२०१९, दिनांक २७ सप्टेंबर, २०१९ चे पत्र,
५. उपजिल्हाधिकारी (सा.प्र.), रायगड यांचे पत्र क्र.साशा/कार्या-१/ब-४/अनुदान मागणी/२०२०, दिनांक २० जानेवारी, २०२० चे पत्र
६. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे अ.शा.पत्र क्र.ससाशा/कार्या-२/कावि १४/२०२०, दिनांक १४ फेब्रुवारी, २०२० चे पत्र

**प्रस्तावना -**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतिगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती दिनांक २० डिसेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबत कार्यपध्दती दिनांक २१ जून, २०१३ व दिनांक २८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृह बांधकाम करण्याकरिता सन २०२०-२१ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.१८.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.४, ५ व ६ च्या पत्रांन्वये शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम व शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जिल्हा-रायगड येथील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता तसेच शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी येथील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या बांधकामाकरिता निधी वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकास अनुसरुन निधी सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी यांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दिनांक ४ मे, २०२० च्या परिपत्रकास अनुसरून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता आवश्यक असणारा कार्यक्रमावरील खर्चावरील सुधारित अंदाजाच्या मर्यादेत एकूण रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| व्यवस्थापनाकरिता | | |
| १. | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | रु.१५,३०,०००/- |
| २. | शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जिल्हा-रायगड | रु.१७,३०,०००/- |
| बांधकामाकरिता | | |
| ३. | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | रु.१,४७,४०,०००/- |
| | एकूण : | रु.१,८०,००,०००/- |

२. वरीलप्रमाणे जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी यांना त्यांच्या अधिपत्याखालील शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम व शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जिल्हा-रायगड येथील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता तसेच शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी येथील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या बांधकामाकरिता एकूण रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) एवढी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी -नियंत्रक अधिकारी◦ आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी -आहरण व संवितरण अधिकारी◦ म्हणून काम पाहतील.

४. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी यांनी शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

५. सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा/ CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

६. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४ मे, २०२० मधील अटींची पुर्तता होत असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तावास नियोजन विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.९४/२०२०/वित्त विभाग/व्यय-१, दिनांक २३ जून, २०२० अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२००६२३१४५६४५५२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.06.23 15:03:45 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर,
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर,
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) जिल्हाधिकारी, वाशिम, रायगड व रत्नागिरी,
५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई,
६) प्राचार्य/अध्यक्ष/संचालक (शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी / शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम / शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जिल्हा-रायगड)
७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई,
८) अवर सचिव, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम, रायगड, लातूर व रत्नागिरी,
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१२) निवड नस्ती, कार्यासन-८